**मुख्यमंत्री सहाय्यता निधी न्यास**
**व्यवस्थापन समितीचे नियम व विनियम.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- सीआरएफ-२०१७/प्र.क्र.६७/२०१७/२५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दि: २८ नोव्हेंबर, २०१८

वाचा : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:सीआरएफ-१०६७/बी, दि.२.३.१९६७

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:सीआरएफ-२००१/प्र.क्र.१९७/२००१/२५, दि.१५.११.२००१

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक :सीआरएफ-१००९/प्र.क्र.२०९/२००९/२५, दि.१६.२.२०१०

४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक सीआरएफ-२०१७/प्र.क्र.६७/२०१७/२५, दि.१७.४.२०१७

५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक सीआरएफ-२०१७/प्र.क्र.६७/२०१७/२५, दि.६.७.२०१७

**प्रस्तावना:**

राज्यातील तथा देशातील नैसर्गिक आपत्तीतील आपदग्रस्तांना अर्थसहाय्य करण्याच्या उद्दिष्टाने "मुख्यमंत्री सहाय्यता निधी" या सार्वजनिक न्यासाची स्थापना शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीआरएफ-१०६७/बी, दि.२.३.१९६७ अन्वये करण्यात आली आहे. तसेच, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:सीआरएफ-२००१/प्र.क्र.१९७/२००१/२५, दि.१५.११.२००१ अन्वये सदर न्यासाची उद्दिष्टे निश्चित करण्यात आली आहेत. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक सीआरएफ-२०१७/ प्र.क्र.६७/ २०१७/२५, दि.१७.४.२०१७ व दि.६.७.२०१७ अन्वये उद्दिष्टांच्या व्याप्तीत वाढ करण्यात आलेली आहे. भविष्यातील न्यासाचे आर्थिक व्यवहार व गुंतवणुकीत सुलभता यावी ही बाब विचारात घेऊन मुख्यमंत्री सहाय्यता निधी या सार्वजनिक न्यासाच्या नियम व विनियमात वाढ करण्याच्या मुख्यमंत्री सहाय्यता निधी कक्षाच्या प्रस्तावास, मुख्यमंत्री सहाय्यता निधी न्यास व्यवस्थापन समितीचे पदसिद्ध अध्यक्ष मा.मुख्यमंत्री महोदय यांनी मान्यता दिली आहे.

**शासन निर्णय :**

मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम १९५० मधील तरतूदीनुसार मुख्यमंत्री सहाय्यता निधी न्यासाची उद्दिष्टे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक:सीआरएफ-२००१/प्र.क्र.१९७/२००१/२५, दि.१५.११.२००१ अन्वये निश्चित करण्यात आली आहेत. भविष्यातील न्यासाचे आर्थिक व्यवहार व गुंतवणूकीत सुलभता यावी यासाठी शासन निर्णय दि.१५.११.२००१ मधील नियम ७) न्यासाचे बँकींग व्यवहार मधील (१) नंतर पुढील प्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**नियम व विनियम :**

(७) न्यासाचे बँकींग व्यवहार

(१) न्यासाचे बँकींग व्यवहार हे स्टेट बँक ऑफ इंडिया अथवा अन्य राष्ट्रीयकृत बँकेतून केले जातील.

**(२) न्यासाचे उत्पन्न मर्यादित असल्याने विनियोगासाठी अधिक रक्कम उपलब्ध व्हावी यासाठी वित्त विभाग, शासन निर्णय दि.२७.१०.२०१५ मधील तरतूदीचे अनुपालन करून न्यासाच्या दैनंदिन व्यवहारासाठीचे बचत खाते तसेच मुदतठेवी खाजगी बँकामध्ये उघडण्याची मुभा राहील.**

२. हा शासन निर्णय मुख्यमंत्री सहाय्यता निधी न्यास व्यवस्थापन समितीचे पदसिद्ध अध्यक्ष मा.मुख्यमंत्री महोदय यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८११२८११३६५८७८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Somnath Namdeo Bagul

Digitally signed by Somnath Namdeo Bagul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, cn=Somnath Namdeo Bagul
Date: 2018.11.28 16:19:04 +05'30'

**( सो. ना. बागुल )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. राज्यपालांचे सचिव,
२. मुख्यमंत्र्याचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
३. मुख्य सचिवांचे उप सचिव,
४. मुख्यमंत्र्याचे उप सचिव,
५. मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव,
६. मा.मंत्री (विधि व न्याय ) यांचे खाजगी सचिव,
७. मंत्री (पुनर्वसन व मदत कार्य) यांचे खाजगी सचिव,
८. इतर सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
९. प्रधान सचिव (वित्त)
१०. मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
११. सचिव व विशेष आयुक्त (मदत व पुनर्वसन)
१२. धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई -४०० ०१८,

१३. सहाय्यक संचालक (निधी व लेखा) मुख्यमंत्री सचिवालय,

१४. सर्व विभागीय आयुक्त,

१५. सर्व जिल्हाधिकारी,

१६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

१७. सर्व मंत्रालयीन विभाग,

१८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी),

१९. व्यवस्थापक, स्टेट बँक ऑफ इंडिया, रिक्लेमेशन शाखा, रहेजा चेंबर्स, नरिमन पॉईंट, मुंबई,

२०. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२,

२१. सर्व सन्माननीय संसद सदस्य,विधान परिषद/विधान सभा सदस्य, महाराष्ट्र राज्य,

२२. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद), विधानभवन, मुंबई-३२,

२३. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान सभा), विधानभवन, मुंबई-३२,

२४. सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची मध्यवर्ती कार्यालये

२५. निवड नस्ती.